**सन २०१९-२०२० मध्ये महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी करण्यात आलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रदर्शन - २०१९/प्र.क्र.५३/ योजना-१

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: २५ मार्च, २०२२

**वाचा -**

१) **ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः** पणन-२००८/प्र.क्र.७३८/योजना-१, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९.

**प्रस्तावना -**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : पणन- २००८/प्र.क्र.७३८/ योजना- १, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ अन्वये स्वयंसहाय्यता बचत गटाच्या उत्पादित मालाची विक्री व प्रदर्शनासाठी राज्यस्तरावर भरविण्यात येणाऱ्या महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी रु. ५०.०० लक्ष इतके अर्थसहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर प्रदर्शनासाठी सन २०१९-२०२० मध्ये आवश्यक निधी अर्थसंकल्पीत करण्यात येऊन वित्त विभागाकडून प्राप्त झालेला निधी समक्रमांकाच्या दिनांक २६ मार्च, २०२० च्या शासन निर्णयान्वये बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात आला होता. तथापि, वित्त विभागाने घातलेल्या बंधनांमुळे सदरचा निधी आहरीत करता आला नाही व त्यामुळे प्राप्त निधी समर्पित झाला. सन २०१९ -२०२० मध्ये महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी करण्यात आलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय देण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : पणन- २००८/प्र.क्र.७३८/ योजना-१, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ अन्वये स्वयंसहाय्यता बचत गटाच्या उत्पादित मालाची विक्री व प्रदर्शनासाठी राज्यस्तरावर भरविण्यात येणाऱ्या महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी रु.५०.०० लक्ष इतके अर्थसहाय्य देण्याच्या निर्णयाच्या अनुषंगाने सन २०१९-२०२० मध्ये राज्यस्तरावर भरविण्यात आलेल्या

महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी झालेल्या रु. ५०.०० लक्ष इतक्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी आवश्यक निधी सन २०२१-२२ या वर्षाच्या मंजूर निधीतून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सन २०१९-२०२० मध्ये महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी करण्यात आलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांना एकूण रू. ५०,००,०००/- (अक्षरी रूपये पन्नास लक्ष मात्र) इतका निधी आहरित करण्यासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) व्दारे वितरीत करण्यात येत आहे. सदरचा निधी दिनांक ३१.०३.२०२२ पर्यंत खर्च करणे बंधनकारक राहील.

३. सदरचा खर्च “मागणी क्रमांक एल-३, "२५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) (०४) प्रदर्शने व कायमस्वरूपी विक्री बांधणे (कार्यक्रम) (२५०१ १९९३) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०२१-२०२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सन २०१९-२० या वर्षाकरीता महालक्ष्मी सरस प्रदर्शनाकरीता झालेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता निधी वितरीत करताना देयकांची तपासणी व छाननी करण्याचे निर्देश वित्त विभागाने त्यांच्या दिनांक १६ मार्च, २०२२ रोजीच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १७६/व्यय-११ नुसार दिलेले असल्याने प्राप्त देयकांची तपासणी व छाननी करुनच निधी वितरीत करण्याची खबरदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी घ्यावी. तसेच हे अनुदान सन २०१९-२० या वर्षाकरीता महालक्ष्मी सरस प्रदर्शनाकरीता झालेलया खर्चाच्या प्रतिपूर्ती करण्याकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, व त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे अन्यथा ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अनुदानाबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी उपयोगिता प्रमाणपत्र योजना-१ कार्यासनास तात्काळ सादर करावे. तसेच पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी, कार्यासन योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. (१) मंजूर केलेली रक्कम, (२) कोषागारातून काढलेली रक्कम, (३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक. तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं- २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२२ नुसार तसेच वेळोवेळी दिलेल्या अटी व शर्तीची पूर्तता

करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांची राहील. महालक्ष्मी सरस प्रदर्शनाकरिता प्रत्येक आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांना प्राप्त होणारा एकूण निधी व प्रदर्शनावर होणारा तपशीलवार खर्च याबाबतची सविस्तर माहिती शासनास पाठवावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग-एक, उप विभाग - तीन अनुक्रमांक चार परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय प्राधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१५३८२७६७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghansham Jibhau Jadhav

Digitally signed by Ghansham Jibhau Jadhav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=914f966ddb6386e4d7e8470d42c78cce723425cbba133d00e6872290d2d49ef0, serialNumber=c8e8dc20f7ed71575c1b77071ac41ad68149b2c52d376aa00fd9b96da46fc1f8, cn=Ghansham Jibhau Jadhav
Date: 2022.03.28 15:47:32 +05'30'

**( घ. जि. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (ले. व अ.)/ (ले.प.), महाराष्ट्र -१ ,मुंबई / महाराष्ट्र -२ , नागपूर.
२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई.
४. आहरण व संवितरण अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई.
५. विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, नवी मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्यासन- योजना-७/वित्त-१.
८. लेखाधिकारी, कार्यासन - योजना-२.
९. निवड नस्ती, योजना-१ कार्यासन.